पावसाळ्यात उद्भवणाऱ्या
जलजन्य साथरोगांच्या
उद्रेकाबाबत करावयाची
उपाययोजना

महाराष्ट्र शासन
पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग

## शासन परिपत्रक क्रमांकः डब्ल्यूक्यूएम- २०१५/ प्र. क्र. ५०/ पापु-१२

गोकुळदास तेजपाल रुग्णालय आवार, ७ वा मजला, लोकमान्य टिळक मार्ग,
मुंबई - ४००००१
तारीख: २९ मे, २०१५

वाचा -

१) **शासन निर्णय क्रमांकः ग्रापापु-१०९६/ प्र. क्र. १२८०/ पापु-०७, दि. २८.११.१९९६**

२) **शासन निर्णय क्रमांकः डब्ल्यूक्यूएम-२००३/ प्र. क्र. ९०/ पापु-१२, दि. ०८.१०.२००३**

**शासन परिपत्रक -**

राज्यातील काही भागात भूगर्भातील व भूपृष्ठावरील पाणी साठा कमी झाल्यामुळे आणि उन्हाळ्यामुळे अनेक ठिकाणी पाणी टंचाईची परिस्थिती निर्माण होते. तसेच पावसाळ्यात दूषित पाणी वाहून आल्याने, ग्रामीण व नागरी भागात साथ रोगांचा प्रादुर्भाव मोठ्या प्रमाणात होत असतो. अशा परिस्थितीत पाणी पुरवठा योजनांच्या माध्यमातून पुरवठा होणाऱ्या पिण्याच्या पाण्यावर योग्य शुद्धीकरण प्रक्रिया करणे अत्यंत आवश्यक असते. पाण्याचे शास्त्रोक्त पध्दतीने नियमित शुध्दीकरण व निर्जंतुकीकरण न करता पाणी पुरवठा झाल्यास साथरोगांचा प्रादुर्भाव होऊन प्रसंगी जिवितहानीचीही शक्यता असते.

२. पिण्यासाठी स्वच्छ व शुद्ध पाण्याचा नियमितपणे पुरवठा करणे ही अंतिमत: शासनाची जबाबदारी ठरते. ही जबाबदारी अधिक परिणामकारक, निर्दोष व नियोजनबद्धरित्या पार पाडण्यासाठी पाणी पुरवठा व स्वच्छता विभागासोबतच ग्राम विकास व जलसंधारण विभाग, सार्वजनिक आरोग्य विभाग, नगर विकास विभाग, सहसंचालक, आरोग्य सेवा संचालनालय, पुणे यांच्याकडून प्रत्येक वर्षी पावसाळ्याच्या प्रारंभी सतर्कता बाळगण्याच्या सूचना सर्व क्षेत्रिय यंत्रणांना देण्यात येत असतात.

३. पाणी पुरवठा करण्याची जबाबदारी असलेल्या प्रत्येक स्थानिक स्वराज्य संस्थेने आपल्या कार्यक्षेत्रात कोणत्याही साथींचा उद्रेक होऊ नये याबाबत आवश्यक ती दक्षता घ्यावी व पुढील उपाययोजनांचे काटेकोरपणे पालन करावे जेणेकरुन जलजन्य साथरोगांच्या उद्रेकास निश्चितच आळा बसू शकतो.

- योग्य शास्त्रीय पध्दतीने नियमित शुध्दीकरण प्रक्रिया करुन पाणी पुरवठा करण्यात यावा.
- जलस्त्रोतांजवळचा व जल वाहिन्यांजवळचा परिसर स्वच्छ ठेवण्यात यावा.
- पाणी पुरवठा यंत्रणांची वेळेवर व सुयोग्य देखभाल ठेवण्यात यावी.
- मुख्य कार्यकारी अधिकारी व जिल्हा आरोग्य अधिकारी यांनी दुषित पाणी नमुन्याबाबतचा आढावा घेवून याबाबत आवश्यक ती उपाययोजना करावी, याबाबतचा अहवाल शासनास सादर करावा.
- पाणी गुणवत्ता संनियंत्रणातील त्रुटी दूर करण्यासाठी ग्राम विकास विभाग, सार्वजनिक आरोग्य विभाग व पाणी पुरवठा विभाग यांच्या सहमतीने निर्गमित केलेल्या प्रपत्रातील माहिती उपलब्ध करुन द्यावी.
- सांडपाण्याचा निचरा व्यवस्थित होतो किंवा नाही याची पाहणी करुन आवश्यक त्या उपाययोजना करण्यात याव्यात.
- डास / माशांचा प्रादुर्भाव होऊ नये म्हणून स्वच्छता विषयक उपाययोजना करण्यात याव्यात.
- पाणी शुध्दीकरणासाठी सर्व स्तरावर योग्य दर्जाची ब्लिचिंग पावडर, सोडिअम हायपोक्लोराईट द्रावण, तुरटी यांचा पुरेसा साठा उपलब्ध ठेवण्यात यावा.
- ज्या ठिकाणी ब्लिचिंग पावडरचा साठा नाही अथवा कमी आहे, तेथे ब्लिचिंग पावडरचा तात्काळ पुरवठा करण्यात यावा.
- सार्वजनिक आरोग्य विभागामार्फत क्लोरीन द्रावणाचा अथवा क्लोरीनच्या गोळ्यांचा साठा प्रत्येक प्राथमिक आरोग्य केंद्रात तसेच उपकेंद्रात उपलब्ध करुन दिला जातो. ज्या ठिकाणी साथीच्या रोगांचा उद्रेक झाला असेल किंवा होण्याची शक्यता असेल त्या ठिकाणी घरोघरी या द्रावणाच्या बाटल्यांचा अथवा क्लोरिनच्या गोळ्यांचा उपयोग करुन पाणी शुध्द करुन घेण्यात यावे.
- सुरक्षित पाणी मिळविण्यात येणाऱ्या अडचणीबरोबर दूषित पाणी पुरवठा, दूषित जलस्त्रोत, जुनाट आणि गंजलेले नळ (पाईप लाईन ) व गटारामधून जाणाऱ्या जलवाहिन्या यामुळेही अनेकदा गॅस्ट्रो, काविळ, कॉलरा, अतिसार, विषमज्वर इत्यादी जलजन्य आजारांचा उद्रेक होत असतो. यासाठी पाणी पुरवठा करणाऱ्या पाईप लाईन्सची तपासणी करुन, त्यांना गळत्या असल्यास त्या काढणे व त्या पाईप लाईन्स गटारातून अथवा गलिच्छ पाण्यातून जाणार नाहीत याची दक्षता घेण्यात यावी.

- दुषित पाणी पुरवठ्यामुळे निर्माण होणाऱ्या समस्यांबाबत पुरेशी जनजागृती केल्यास या उपायांची अंमलबजावणी करणाऱ्या शासकीय यंत्रणेच्या प्रयत्नांना जनतेकडूनही सकारात्मक प्रतिसाद मिळू शकतो. त्यामुळे माहिती प्रसारमाध्यमांद्वारे उदा. स्थानिक वृत्तपत्रे, केबल टी.व्ही, नेटवर्क, भिंतीचित्रे, पोस्टर्स, बॅनर्स, लाऊडस्पिकर्स इत्यादी माध्यमांद्वारे दुषित पाण्यामुळे होणाऱ्या साथरोगांची माहिती जनतेला देण्यात यावी. यासाठी स्थानिक आठवडी बाजार, बस स्थानके, रेल्वेस्थानके, बाजारपेठा, धार्मिक व पर्यटन स्थळे, शाळा, कॉलेजेस अशा गर्दीच्या ठिकाणी जनजागृतीचे कार्यक्रम नियमितपणे राबविण्यात यावेत.
- तसेच संबंधित अधिकारी /कर्मचारी यांच्या साप्ताहिक बैठका घेऊन कामाचा आढावा घेण्यात यावा व त्यानुसार मार्गदर्शन करण्यात यावे.
- नागरिकांना निर्जंतुक व सुरक्षित पाणी पुरवठा करण्याच्या स्थानिक स्वराज्य संस्थेच्या मुलभूत कर्तव्यामध्ये कसूर करणाऱ्या संबंधित अधिकारी व कर्मचाऱ्यांवर कठोर कारवाई करणे हे सुद्धा आवश्यक आहे. गेल्या पाच वर्षातील जलजन्य रोगांची लागण व मृत्यू याचा आढावा घेऊन ज्या गावात जलजन्य रोगामुळे होणाऱ्या मृत्यूंची संख्या मोठ्या प्रमाणात असेल तेथे विशेष लक्ष देण्यात यावे.

४. आपणास सूचित करण्यात येते की, जलजन्य रोगांच्या उद्रेकांना आळा घालण्यासाठी वरीलप्रमाणे उपाययोजनांची कठोर अंमलबजावणी करून जनतेस शुद्ध व निर्जंतुक पाणी पुरवठा ही महत्वपूर्ण आणि जीवनावश्यक सामाजिक सेवा वेळेवर उपलब्ध करुन देण्याबाबत सतर्क आणि जागरुक राहण्याच्या सूचना सर्व संबंधित अधिकाऱ्यांना देण्यात याव्यात व या उपाययोजनांचा नियमित आढावा घेण्यात यावा.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०५२९१३०४२०५५२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Rajesh Kumar

Digitally signed by Rajesh Kumar
DN: CN = Rajesh Kumar, C = IN, S = Maharashtra, O = ALL INDIA SERVICE, OU = IAS
Date: 2015.05.30 16:27:24 +05'30'

**( राजेश कुमार )**
प्रधान सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१) प्रधान सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
२) प्रधान सचिव, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
३) प्रधान सचिव, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई
४) विभागीय आयुक्त (सर्व).
५) आयुक्त, महानगरपालिका (सर्व ).
६) आयुक्त, मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण, वांद्रे, मुंबई.
७) संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई.
८) संचालक (आर.एस.पी.एम्.यू) पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई.३२
९) सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, एक्सप्रेस टॉवर्स, नरिमन पॉईंट मुंबई.
१०) संचालक, भूजल सर्व्हेक्षण व विकास यंत्रणा, पुणे.
११) महासंचालक (आरोग्यसेवा), आरोग्य संचालनालय, मुंबई.
१२) जिल्हाधिकारी (सर्व).
१३) मा.मंत्री,पाणी पुरवठा व स्वच्छता यांचे खाजगी सचिव
१४) प्रधान सचिव,पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे स्वीय सहाय्यक
१५) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व).
१६) अधीक्षक अभियंता तथा जिल्हा पाणी पुरवठा अधिकारी, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण (सर्व)
१७) उपसंचालक (आरोग्यसेवा), राज्य आरोग्य प्रयोगशाळा, पुणे.
१८) कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद (सर्व)
१९) जिल्हा आरोग्य अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व ).
२०) मुख्याधिकारी, नगरपालिका (सर्व).
२१) निवड नस्ती, का.क्र. पा.पु. १२